अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या स्वयंसहायता बचत गट योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- माविम -२०२१/प्र.क्र.७९/का-९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २९ डिसेंबर, २०२१.

वाचा:- (१) शासन निर्णय,वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि. २४ जून, २०२१.

(२) शासन निर्णय क्र.अविवि २०२०/प्र.क्र.२५/का-९ दि.१ ऑक्टोबर,२०२०.

(३) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ यांचे पत्र क्र. माविम पीएमडी/२०२१-२२/३६/ दि. १६ जून, २०२१.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात वास्तव्यास असलेल्या लोकसमूहातील महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणासाठी त्यांना संघटीत करुन पुरेसा पतपुरवठा उपलब्ध करून देणे व त्यांना उदयोजकतेविषयक आवश्यक असलेली माहिती देऊन त्यांच्यामध्ये उदयोजकीय कौशल्ये विकसित करण्याच्या हेतूने अल्पसंख्याक लोकसमुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अंतर्गत पहिल्या टप्प्यात मुंबई शहर, मुंबई उपनगर, नांदेड, मालेगाव, कारंजा, परभणी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, भिवंडी, मुंब्रा-कौसा आणि मिरज येथे अल्पसंख्याक लोक समुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास शासन निर्णय दि.२८ फेब्रुवारी,२०१२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेतंर्गत अल्पसंख्याक महिलांचे २४०० बचत गट निर्माण करून त्यांचे १३ लोकसंचलित साधन केंद्र ८ वर्षाच्या कालावधीत उभी राहणार आहेत. महिला आर्थिक विकास महामंडळाने ३१ मार्च,२०२० या ८ वर्षाच्या कालावधीत ३२०० बचतगट व ८ लोकसंचलीत साधन केंद्राची स्थापना केली आहे. सदर योजनेचा ८ वर्षाचा कालावधी संपूष्टात आल्याने सदर योजनेस संदर्भ क्र.२ दि.१ ऑक्टोबर,२०२० च्या शासन निर्णयान्वये ५ वर्ष (१ एप्रिल,२०२० ते ३१ मार्च,२०२५) मुदतवाढ देण्यात आली आहे.

या योजनेसाठी सन २०२१-२२ या वर्षात अंमलबजावणीसाठी रु.७.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी संदर्भ क्र.१ दि.२४ जून,२०२१ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या वर्षामध्ये एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ६०%च्या मर्यादेत निधी खर्च करण्यास परवानगी देण्यात येणार आहे. त्यानुसार वित्त विभागाने या योजनेकरीता एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ३०% प्रमाणात रु.२.१० कोटी (अक्षरी रु.दोन कोटी दहा लक्ष फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात "स्वयंसहाय्य गटाकरीता सहायक अनुदान" या योजनेसाठी अर्थसंकल्पित एकूण रु. ७,००,००,०००/- (अक्षरी रु. सात कोटी फक्त) निधीपैकी माहे एप्रिल, २०२१ ते डिसेंबर, २०२१ या कालावधी करिता ३० टक्के च्या मर्यादेत रु. २,१०,००,०००/- (अक्षरी रु. दोन कोटी दहा लक्ष फक्त) एवढा निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार "स्वयंसहाय्य गटाकरीता सहायक अनुदान" या योजनेसाठी अर्थसंकल्पित एकूण रु. ७,००,००,०००/- (अक्षरी रु. सात कोटी फक्त) निधीपैकी माहे एप्रिल, २०२१ ते डिसेंबर, २०२१ या

कालावधी करिता ३० टक्के च्या मर्यादेत रु. २,१०,००,०००/- (अक्षरी रु. दोन कोटी दहा लक्ष फक्त) एवढा निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर रकमेचा Electronic Clearing Service (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.

३. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहिल. सदर निधीची रक्कम आहरित करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रण अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. यासाठी होणारा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र.झेडई-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१०) स्वयंसहाय्य गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९)कार्यक्रम, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत याबाबतच्या वर्षनिहाय खर्चाचा लेखाविषयक तपशील ठेवण्यात यावा. ज्या बाबींसाठी अनुदान वितरित करण्यात आले आहे त्या बाबींवरच खर्च करण्यात यावा. तसेच, सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र क्र ३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यास आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि. २४ जून, २०२१.मधील सर्व अटींची व त्या सोबतच्या परिशिष्टांमधील मार्गदर्शन सूचनाची पुर्तता होत असून व नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८७/२०२१/व्यय-१ दि.२०.९.२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२९१६११२७६७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.01.20 16:00:09 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा. मंत्री /राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई

१०) कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

११) कक्ष अधिकारी (१४७५), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

१२) कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

१३) निवडनस्ती (कार्यासन ९) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.